**तारकेश्वरी बहुउद्देशीय समाज सेवा व शिक्षण प्रसारक संस्था द्वारा संचलीत कोहीनूर मेंटली चॅलेंज्ड चिड्रन, नागपूर ही बंद पडलेली अनुदानीत अपंगांची विशेष शाळा अविष्कार सांस्कृतिक व सामाजिक अपंग विकास संस्था, नागपूर या संस्थेला हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: इडीडी २०१३/प्र.क्र.३५०/अ.क.१**

मंत्रालय, मुंबई -४०००३२.

दिनांक : १२ ऑगस्ट, २०१५.

वाचा :- १) शासन निर्णय समाज कल्याण व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.इडीडी २००१/ प्र.क्र.५०२/सुधार-२, दि.१९.७.२००३ व समक्रमांकित शासन पुरकपत्र दि.४.१२.२००३.

२) शासन निर्णय क्र.इडीडी २०१३/प्र.क्र.३५०/अपंग कल्याण-१, दि.२४.१.२०१४.

३) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे क्र.अकआ/प्र-४/मति/हस्तांतर स्थलांतर /तारकेश्वरी/नागपूर/२०१४-१५/१४३९, दि.३०.८.२०१४.

४) शासन निर्णय क्र.इडीडी २०१३/प्र.क्र.३५०/अक-१, दि.५.९.२०१४.

५) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे क्र.अकआ/प्र-४/मति/हस्तांतर स्थलांतर /कोहिनूर/हाफीज बेग/तपासणी अहवाल/यवतमाळ/२०१५-१६/९०९२, दि.१४.५.२०१५.

६) शासन आदेश क्र.इडीडी २०१३/प्र.क्र.३५०/अक-१, दि.८.६.२०१५.

**प्रस्तावना -**

तारकेश्वरी बहुउद्देशीय समाज सेवा व शिक्षण प्रसारक संस्था द्वारा संचलीत कोहीनूर मेंटली चॅलेंज चिड्रन, नागपूर ही बंद पडलेली अनुदानीत मतिमंद प्रवर्गातील अपंगांची विशेष शाळा अन्य सक्षम संस्थेस हस्तांतरीत करण्याबाबतच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय —**

तारकेश्वरी बहुउद्देशीय समाज सेवा व शिक्षण प्रसारक संस्था द्वारा संचलीत कोहीनूर मेंटली चॅलेंज चिड्रन, नागपूर ही बंद पडलेली अनुदानीत मतिमंद प्रवर्गातील अपंगांची विशेष शाळा मौजे आर्णी, जि.यवतमाळ परिसरातील मतिमंद प्रवर्गातील विद्यार्थ्यांची शैक्षणिक गैरसोय दूर व्हावी आणि पंचक्रोशीतील सदरील शाळेची आवश्यकता असल्याची बाब विचारात घेऊन हाफिज बेग एज्युकेशन फाऊंडेशन आर्णी, जि. यवतमाळ या संस्थेस संदर्भाधिन दि.५.९.२०१४ च्या शासन निर्णयानुसार हस्तांतरीत व स्थलांतरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. तथापि आयुक्त, अपंग कल्याण, पुणे

यांच्याकडून सदर संस्थेची तपासणी करण्यात आली व त्याबाबतचा अहवाल दि.१४.५.२०१५ रोजी शासनास सादर करण्यात आला. सदर अहवालामध्ये सदरची संस्था आर्णी, जि.यवतमाळ या ठिकाणी चालू नसल्याचे निदर्शनास आले.

२. त्यानुषंगाने मा.मंत्री (सा.न्या.) यांच्याकडे सुनावणी घेऊन शासनाच्या दि.८.६.२०१५ च्या आदेशान्वये तारकेश्वरी बहुउद्देशीय समाज सेवा व शिक्षण प्रसारक संस्था द्वारा संचलीत कोहीनूर मेंटली चॅलेंज चिड्रन, नागपूर ही बंद पडलेली अनुदानीत मतिमंद प्रवर्गातील अपंगांची विशेष शाळा मौजे आर्णी, जि.यवतमाळ या संस्थेस देण्याबाबतचे शासनाचे दि.५.९.२०१४ चे आदेश रद्द करण्यात आले आहेत. आता सदर संस्था अविष्कार सांस्कृतिक व सामाजिक अपंग विकास संस्था, नागपूर या संस्थेत खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती खालील प्रमाणे आहेत** :-

१) सदरहू संस्थेने शाळा अपंग व्यक्ती (समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीनुसार नागपूर येथे सुरु करावी.

२) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी सदरहू संस्थेची शाळा सुरु झाल्यानंतर तपासणी करुन संबंधीत संस्था अपंग व्यक्ती (समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीनुसार अनुज्ञाप्ती देण्यास पात्र असल्याची खात्री करुन अनुज्ञाप्ती द्यावी.

३) शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या अटी व शर्तीची सदरहू संस्थेस पूर्तता करणे बंधनकारक राहील.

४) वरीलप्रमाणे शासनाच्या आदेशाचे आणि अटी व शर्तीचे पालन न केल्यास संबंधीत संस्थेस स्थलांतर करण्यास दिलेली शाळेची मान्यता रद्द करण्यात येईल.

५) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे तथा सक्षम प्राधिकारी यांनी अपंग व्यक्ती (समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीनुसार तसेच अपंग शाळा १९९७ च्या संहितेनुसार आणि शासनाने वेळोवेळी काढलेल्या स्थायी आदेशानुसार व मा.न्यायालयाचे काही आदेश /निर्णय असल्यास ते लक्षात घेऊन संस्थेस हस्तांतर व स्थलांतर करण्याबाबत योग्य ती कार्यवाही करावी.

६) या प्रकरणी हस्तांतर व स्थलांतर करण्यास काही अडचणी उद्भवल्यास आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी वस्तुस्थितीदर्शक अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

७) तारकेश्वरी बहुउद्देशीय समाज सेवा व शिक्षण प्रसारक संस्था द्वारा संचलीत कोहीनूर मेंटली चॅलेंज चिड्रन, नागपूर या शाळेतील प्रशासकीय मान्यताप्राप्त कर्मचा-यांना नवीन संस्थेत प्राथम्याने सामावून घेण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१५०८१२१८३९३९२६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap P Lubal

Digitally signed by Pratap P Lubal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap P Lubal
Date: 2015.08.12 18:42:22 +05'30'

**( प्र. पां. लुबाळ )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
२) मा. प्रधान सचिव (सा.न्या.)
३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर/यवतमाळ
५) प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण विभाग, नागपूर/ अमरावती
६) समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,नागपूर/यवतमाळ
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९) अध्यक्ष, तारकेश्वरी बहुउद्देशीय समाज सेवा व शिक्षण प्रसारक संस्था संचलीत कोहीनूर मेंटली चॅलेंज चिड्रन, नागपूर.
१०) अध्यक्ष, अविष्कार सांस्कृतिक व सामाजिक अपंग विकास संस्था, नागपूर
११) निवडनस्ती,अपंग कल्याण-१.

****